केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करण्यासाठी 'SNA-SPARSH' समयोचित प्रणाली एकीकृत शीघ्र हस्तांतरण (Real Time System of Integrated Quick Transfers) या पर्यायी निधी प्रवाह कार्यपध्दतीची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत राज्य संलग्नित योजना [State Linked Schemes (SLSs)] निहाय भारतीय रिझर्व्ह बँक येथे स्वतंत्र आहरण खाते (Drawing Account) उघडण्यास मान्यता प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५१/कोषा प्रशा-४,**
वित्त विभाग, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक ०३ मार्च, २०२५

वाचा :-१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभाग यांचेकडील कार्यालयीन ज्ञापन No.F.No.1 (27)/PFMS/2020, dated 13/07/2023

२) भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभाग यांचेकडील कार्यालयीन ज्ञापन No.F.No.1 (27)/PFMS/2020, dated 21/05/2024.

३) संचालनालय, ले. व को. यांचे क्र.संलेवको/सुधारणा /न.क्र. ५२/SNA SPARSH/२०२४-२५, दि.१०.१०.२०२४ चे पत्र.

४) महालेखापाल (ले. व अ.), महाराष्ट्र-१, मुंबई कार्यालयाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि/चा-१/वित्त विभाग/युओआर-१४६/२०२४-२५/९०९, दि.२४.०९.२०२४.

५) भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभाग यांचेकडील कार्यालयीन ज्ञापन No.F.No.1 (27)/PFMS/2020, dated 4/10/2024.

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५१/कोषा प्रशा-४, दि.१०.१०.२०२४

७) संचालनालय, ले. व को. यांचे क्र.संलेवको/सुधारणा /न.क्र. ५२/SNA SPARSH/२०२४-२५, दि.७.१.२०२५ चे पत्र.

८) महालेखापाल (ले. व अ.), महाराष्ट्र-१, मुंबई कार्यालयाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.सं:ख.वि/ चा-१/वित्त विभाग/यूओआर-२६६/२०२४-२५/२२३६, दि.०५/०२/२०२५.

**प्रस्तावना:-**

अ) भारत सरकारच्या सर्वसाधारण वित्तीय नियम, २०१७ मधील नियम २३० (७) अन्वये विहीत करण्यात आलेल्या तरतूदीनुसार "निधीचे वेळेत वितरण" (Just In Time Release) हे तत्व शक्य होईल तेवढया प्रमाणात सर्व प्रदानांच्या वितरणासाठी लागू केले जाणे अभिप्रेत आहे. केंद्र शासन

आणि राज्य शासन या दोन्ही स्तरांवरील रोख व्यवस्थापनामध्ये (Cash Management) अधिक परिणामकारकता साध्य करण्यासाठी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS), राज्याची एकात्मिक वित्तीय व्यवस्थापन माहिती प्रणाली (State IFMIS) आणि भारतीय रिझर्व्ह बॅंकेची ई-कुबेर प्रणाली (e-Kuber) यांच्या एकात्मिक रचनेच्या (Integrated Framework) माध्यमातून केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करण्यासाठी **'SNA-SPARSH' (समयोचित प्रणाली एकीकृत शीघ्र हस्तांतरण -Real Time System of Integrated Quick Transfers)** ही पर्यायी निधी प्रवाह कार्यपध्दती (Alternative Fund Flow Mechanism) टप्या-टप्याने प्रस्तावित करण्याचा निर्णय भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक १ येथे नमूद दिनांक १३.०७.२०२३ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये घेण्यात आला आहे .

आ) **'SNA-SPARSH'** अंतर्गत अंमलबजावणीसाठी पहिल्या टप्प्यामध्ये ५ योजना आणि १० राज्यांचा समावेश करण्यात आला होता. त्यामध्ये महाराष्ट्राचा समावेश नव्हता. तथापि, भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली उपविभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक २ येथे नमूद दिनांक २१.०५.२०२४ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये **'SNA-SPARSH'** अंतर्गत अतिरिक्त २२ योजना आणि १० राज्ये यांचा नव्याने अंतर्भाव करण्यात आला आहे. नव्याने समाविष्ठ करण्यात आलेल्या १० राज्यांमध्ये महाराष्ट्र राज्याचा देखील समावेश आहे. भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या निर्देशांस अनुसरुन, SNA SPARSH अंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने राज्य शासनाच्या सबंधित विभागाने भारतीय रिझर्व्ह बॅंक येथे राज्य संलग्नित योजना [State Linked Schemes (SLSs)] निहाय स्वतंत्र आहरण खाते **(Drawing Account)** उघडण्यास **'वाचा'** मधील अनुक्रमांक ६ येथील शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे.

इ) तसेच आता भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक ६ येथे नमूद दिनांक ४.१०.२०२४ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये नव्याने समाविष्ट ४ केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरण गुणोत्तर (Fund sharing pattern) नुसार एकुण ९ राज्य संलग्नित योजना आणि भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक २ येथे नमूद दिनांक २१.०५.२०२४ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये यापूर्वीच समाविष्ट करण्यात आलेल्या ३ केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरण गुणोत्तर (Fund sharing pattern) नुसार एकुण ५ राज्य संलग्नित योजना अशा एकूण १४ राज्य संलग्नित योजनांसाठी रिझर्व्ह बॅंक ऑफ इंडिया येथे राज्य संलग्नित योजनानिहाय स्वतंत्र आहरण खाते (Drawing Account) उघडणे अनिवार्य आहे. त्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक ६ येथे नमूद दिनांक ४.१०.२०२४ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये नव्याने समाविष्ट ४ केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरण गुणोत्तर (Fund sharing pattern) नुसार एकुण ९ राज्य संलग्नित योजना आणि भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली विभागाच्या उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक २ येथे नमूद दिनांक २१.०५.२०२४ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये यापूर्वीच समाविष्ट करण्यात आलेल्या ३ केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरण गुणोत्तर (Fund sharing pattern) नुसार एकुण ५ राज्य संलग्नित योजना अशा एकूण १४ राज्य संलग्नित योजनांसाठी रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया येथे राज्य संलग्नित योजनानिहाय स्वतंत्र आहरण खाते (Drawing Account) उघडणे अनिवार्य आहे. त्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | महाराष्ट्र शासनाच्या विभागाचे नांव | केंद्र पुरस्कृत योजना अनु क्रमांक | सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीनुसार केंद्र पुरस्कृत योजनेचे सद्यस्थितीतील नांव | राज्य संलग्नित योजना अनु क्रमांक | राज्य संलग्नित योजनेचा संकेतांक आणि नांव |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | पशुसंवर्धन व दुग्धविकास विभाग | १ | Livestock Health and Disease Control Programme (LHDP) | १ | MH508 - MH- Livestock Health and Disease Control Programme (CSS) (4123) |
| | | | | २ | MH544 - Establishment and strengthening of existing veterinary Hospital Dispensaries mobile veterinary unitsESV VHD MVU 60 40 |
| | | | | ३ | MH545 - Livestock Health and Disease Control Scheme 100 |
| | | | | ४ | MH546 - Livestock Health and Disease Control Scheme 50 |
| २ | सार्वजनिक आरोग्य विभाग | २ | Flexible Pool for RCH & Health System Strengthening, National Health Program and National urban Health Mission | ५ | MH33 - MH - Flexible Pool for RCH & health System Strengthening, national health Programme and national urban health Mission(4063) |
| | | ३ | Human Resources for Health and Medical Education | ६ | MH278 - MH - Establishment of New Medical Colleges attached with existing District/Referral Hospitals(Govt. Medical College Gondia)- 9157 |

| अ. क्र. | महाराष्ट्र शासनाच्या विभागाचे नांव | केंद्र पुरस्कृत योजना अनु क्रमांक | सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीनुसार केंद्र पुरस्कृत योजनेचे सद्यस्थितीतील नांव | राज्य संलग्नित योजना अनु क्रमांक | राज्य संलग्नित योजनेचा संकेतांक आणि नांव |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | ७ | MH52 - MH - Stengthening and Upgradation of State Government Medical College and Starting New Post Graduate Course and Increasing Post Graduate Seat(9157) |
| | | | | ८ | MH535 - Upgradation of existing State Govt/Central Medical College to increase MBBS Seats in Country |
| ३ | शालेय शिक्षण आणि क्रिडा विभाग | ४ | Pradhan Mantri Poshan Shakti Nirman (PM POSHAN) | ९ | MH7 - MH- NATIONAL PROGRAMME OF MID DAY MEALS IN SCHOOLS(MDM) |
| ४ | कृषि विभाग | ५ | PM Formalization of Micro Food Processing Enterprises Scheme (PM FME) | १० | MH578 - 100% Central Share for Non sharable Components under Prime Minister Formalization of Micro Food Processing Enterprises Scheme (PMFME) |
| | | ६ | Krishionnati Yojana | ११ | MH590 - Krishionnati Yojana-BPSNMEO |
| ५ | नगर विकास विभाग | ७ | Urban Rejuvenation Mission-500 Cities | १२ | MH598- Assistance to Municipal Corporations – Centrally Sponsored AMRUT 2.0 Mission |
| | | | | १३ | MH599- Assistance to Municipalties /Municipal Councils – Centrally Sponsored AMRUT 2.0 Mission |
| | | | | १४ | MH600- Assistance to Nagar Panchayats – Centrally Sponsored AMRUT 2.0 Mission |

२. संबंधित प्रशासकीय विभागांनी सक्षम स्तरावर मान्यता घेऊन उपरोल्लेखित तक्यातील तपशिलाप्रमाणे विभागांतर्गत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने राज्य संलग्नित योजना [State Linked Schemes (SLSs)] निहाय भारतीय रिझर्व्ह बँक येथे प्रत्येकी एक स्वतंत्र आहरण खाते (Drawing Account) उघडण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

३. यासाठी संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ते सहकार्य आणि मार्गदर्शन प्रशासकीय विभागांना उपलब्ध करुन द्यावे. तसेच भारतीय रिझर्व्ह बँक यांचेबरोबर योग्य तो समन्वय ठेऊन प्रस्तुत प्रक्रिया तत्परतेने पूर्ण केली जाईल हे देखील सुनिश्चित करावे.

४. सदर शासन निर्णय महालेखापाल (ले. व अ.), महाराष्ट्र-१, मुंबई कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सं:ख.वि/चा-१/वित्त विभाग/यूओआर-२६६/२०२४-२५/२२३६, दि.०५/०२/२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०३०३१६३८११६२०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2025.03.03 16:40:31 +05'30'

**(डॉ. राजेंद्र सुमन उत्तमराव गाडेकर)**
**उप सचिव, वित्त विभाग**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव,
५. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव
९. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
१०. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभाग प्रमुख / प्रादेशिक कार्यालय प्रमुख / कार्यालय प्रमुख
११. प्रबंधक, (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
१२. प्रबंधक, (अपील शाखा) उच्च न्यायालय , मुंबई
१३. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१७. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१८. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२०. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
२१. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२२. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२३. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२४. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२५. सर्व विभागीय आयुक्त
२६. सर्व जिल्हाधिकारी
२७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२८. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३०. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/ नाशिक/छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/नागपूर
३१. संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, नवी मुंबई
३२. सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई/पुणे/नाशिक/छत्रपती संभाजीनगर / अमरावती/नागपूर
३३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३४. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३५. निवड नस्ती/ कोषा प्रशा-४